महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत अनुसुचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळ जोडणी व वैयक्तिक शौचालये उपलब्ध करुन देण्याकरिता शेगांव, जि.बुलढाणा नगर परिषदेच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी प्रदान करुन राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदानाचा पहिला हप्ता वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांकः नादव-२०१४/ प्र.क्र. २९३/पापु-२२

जी.टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: ३ सप्टेंबर, २०१४

वाचा :

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग नादव-२०१०/प्र.क्र.२१९/पापु-२२, दिनांक २५/६/२०१०
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. नादव-२०१०/प्र.क्र.२९६/पापु-२२, दिनांक ४/१/२०११
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. नादव-२०१०/प्र.क्र. ५०८/पापु-२२, दिनांक १४/१/२०११
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.नादव-२०११/खानवैशौ/ अनुदान/प्र.क्र. १५४/पापु-२४,दिनांक १८/३/२०११ व दिनांक ३१/३/२०११
५) मुख्याधिकारी,नगर परिषद,शेगांव,जि.बुलढाणा यांचे पत्र क्र.१२७१, दिनांक २७/०८/२०१३

प्रस्तावना :

महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त दिनांक २५ जून, २०१० च्या शासन निर्णयान्वये राज्याच्या नागरी भागातील अनुसुचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालये उपलब्ध करुन देण्याकरिता राबविण्यात येणाऱ्या नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत प्रकल्प प्रस्ताव तयार करुन शासनाकडे सादर करताना नागरी स्थानिक संस्थांनी अनुसरावयाची अतिरिक्त मार्गदर्शक तत्वे संदर्भीय दिनांक १४ जानेवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेली आहे. या योजनेंतर्गत नागरी भागातील अनुसूचित जाती

**व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळ जोडण्यासाठी रु.४०००/- प्रतिकुटुंब तर वैयक्तिक शौचालय बांधकामासाठी रु.१२०००/- प्रतिकुटुंब अनुज्ञेय आहे. या योजनेअंतर्गत खाजगी नळजोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी प्रकल्प प्रस्तावाच्या एकूण किंमतीच्या ९०% शासकीय अनुदान अनुज्ञेय असून १०% रक्कम संबधित लाभार्थी किंवा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी उपलब्ध करुन द्यावयाची आहे.**

२. महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत नागरी संस्थांच्या प्रस्तावांना मान्यता देण्यासंदर्भात मा. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समन्वय समितीच्या दिनांक ०४ फेब्रुवारी, २०१४ रोजी आयोजित केलेल्या बैठकीमध्ये संदर्भीय दिनांक २५ जून, २०१० आणि दिनांक १४ जानेवारी, २०११ या दोन शासन निर्णयांमधील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाकडे विहीत पध्दतीने सादर करण्यात आलेल्या **शेगांव, जि.बुलढाणा** या नगर परिषदेच्या प्रस्तावाला, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचेकडून तांत्रिक मुल्यांकन व तांत्रिक मंजूरी घेण्याच्या अटीच्या अधीन राहून, राज्यस्तरीय समन्वय समितीने मंजूरी दिली आहे. राज्यस्तरीय समन्वय समितीने दिलेल्या मंजूरीच्या अनुषंगाने विषयांकित योजनेअंतर्गत या नगर परिषदेच्या प्रकल्प प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

**महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी राबविण्यात येणाऱ्या योजनेअंतर्गत बुलढाणा जिल्हयातील शेगांव नगर परिषदेच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत शेगांव नगर परिषदेस मंजूर करण्यात आलेली कामे आणि त्यानुसार मंजूर किंमतीचे विवरण खालीलप्रमाणे आहे :-**

| अ.क्र. | उपांगाचे नांव | किंमत |
|---|---|---|
| १. | खाजगी नळजोडणी - २१४ X रु.४००० | रु. ८,५६,००० |
| २. | वैयक्तिक शौचालये - ७५ X रु.१२००० | रु. ९,००,००० |
| ३. | नळ कनेक्शन + वैयक्तिक शौचालय - १०८६ X रु१६०००. | रु. १,७३,७६,००० |
| | एकुण किंमत रु. | रु. १,९१,३२,००० |

| अ.क्र. | उपांगाचे नांव | किंमत |
|---|---|---|
| | १.७० % सल्लागार फी | रु. ३,२५,००० |
| | **एकुण ढोबळ किंमत** | रु. १,९४,५७,००० |

२. सदर योजनेअंतर्गत वित्तीय आकृतीबंध खालील प्रमाणे राहील :-

| अ. क्र. | नागरी संस्थेचे नांव व वर्ग | योजनेची किंमत | अनुज्ञेय अनुदान (९० %) | लाभार्थींचा हिस्सा /नागरी संस्थेचा सहभाग (१०%) | १ ल्या हप्त्याचे वितरीत करावयाचे ५०% अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | **शेगांव,** जि. बुलढाणा **ब** वर्ग नगरपरिषद | रु. १,९४,५७,००० | रु.१,७५,११,३०० | रु.१९,४५,७०० | रु.८७,५५,६५० |

३. शेगांव या नगर परिषदेस सदर योजनेअंतर्गत या शासन निर्णयान्वये पहिल्या हप्त्यापोटी शासनाच्या अनुज्ञेय अनुदानापैकी ५०% म्हणजे **रु.८७,५५,६५०/- (रुपये सत्याऐंशी लाख पंचावन्न हजार सहाशे पन्नास फक्त)** इतके अनुदान वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. या योजनेंतर्गत समाविष्ट असणारे लाभार्थी हे अनुसुचित जाती व नवबौध्द घटकातील असल्याबाबत प्रमाणपत्र संबंधित मुख्याधिकारी यांनी दिले असून योजनेंत समाविष्ट लाभार्थी अनुसुचित जाती व नवबौध्द घटकातील असल्याबाबतची खात्री करण्याची तसेच प्रस्तावातील यादीमध्ये समाविष्ट असलेल्या लाभार्थ्यांनाच या योजनेचा लाभ देण्याची जबाबदारी नगर परिषदेची राहील. या संदर्भात कोणत्याही प्रकारची तक्रार आल्यास त्या बाबतची कागदपत्रे शासनास सादर करणे नगरपरिषदेस अनिवार्य राहील.

५. या योजनेअंतर्गत लाभ घेणाऱ्या लाभार्थ्यांना अन्य कोणत्याही पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेअंतर्गत वैयक्तिक नळ जोडणी व वैयक्तिक शौचालयाकरिता या अगोदर लाभ मिळालेला नाही असे प्रमाणपत्र संबंधित मुख्याधिकारी यांनी देणे आवश्यक आहे.

६. या योजनेंतर्गत वैयक्तिक नळ जोडणी देताना योग्यतो दर्जा राखण्याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे दि.१२ एप्रिल, २०१२ च्या परिपत्रकान्वये मार्गदर्शनपर सूचना दिल्या आहेत. त्या सुचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी नगर परिषदेने करणे आवश्यक आहे. विशेषत: नळजोडणी देताना उत्कृष्ट

दर्जा असलेले व जीआय पाईपला पर्यायी पाईप्स म्हणून केंद्र शासनाने विशेष प्राधान्य दिलेले एम.डी.पी.ई. पाईप, अनुषंगिक फिटींग्स् व जॉईंटचा वापर करावा. पाईपचा दर्जा आयएसओ स्पेसिफिकेशन प्रमाणे असणे आवश्यक आहे.

७. नगर परिषदेच्या पाणी पुरवठा व मलनि:स्सारण योजनेसाठी नागरी संस्थेने स्वतंत्र लेखे ठेवणे, सिंकींग फंडाची तरतूद करणे, तसेच बिले देणे व वसुलीत वाढ करणे अनिवार्य राहील.

८. या योजनेंतर्गत नगर परिषदेस अनुज्ञेय अनुदान हे दोन टप्प्यात देण्यात येईल. पहिल्या टप्प्यातील ७०% अनुदान खर्च केल्यावर व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यावर दुसऱ्या टप्प्यातील अनुदान वितरीत करण्यात येईल.

९. या योजनेंतर्गत नागरी दलित वस्ती व नवबौध्द कुटुंबियांना वैयक्तिक शौचालय व नळ जोडणी उपलब्ध करुन देण्यासाठी त्रयस्थ यंत्रणेकडून तपासणी करणे आवश्यक असून ही तपासणी मजीप्राकडून करुन घ्यावी व त्यासाठी धोरणानुसार अनुज्ञेय शुल्क अदा करण्यात येईल.

१०. वैयक्तिक नळ जोडणी व शौचालय उपलब्ध करुन देताना सर्व कामामध्ये समानता असणे आवश्यक असून याची दक्षता नगर परिषदेने घ्यावी.

११. **या योजनेस मंजूरी मिळाल्यावर वरीलप्रमाणे सर्व प्रक्रिया पूर्ण करुन योजनेचे काम १ महिन्याच्या आत सुरू करावे आणि योजना ६ महिन्यात पूर्ण करण्यात यावी. तशी कार्यवाही न केल्यास मंजूरीचा आदेश रद्द करण्यात येईल.**

१२. संबंधित नगर परिषदेने शासनाकडे सादर केलेल्या प्रस्तावातील कामांसाठी मंजूर करण्यात आलेल्या किंमतीमधील शासनाकडून देय ठरविलेल्या सल्लागार शुल्कापैकी खाजगी सल्लागारांकडून तयार करून घेण्यात आलेल्या प्रस्तावांसंदर्भात प्रस्तावातील वैयक्तिक नळजोडणी व वैयक्तिक शौचालय या मुख्य कामांकरिता मंजूर केलेल्या किंमतीच्या २% पर्यंत सल्लागार फी खाजगी सल्लागारांना देण्यात यावी आणि महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत प्रस्तावातील कामांकरिता तांत्रिक तपासणी (appraisal) व तांत्रिक मंजूरी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून करून घ्यावी व त्याबाबतचे सेवाशुल्क महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास अदा करण्यात यावे.

१३. संबंधित नागरी संस्थांनी त्यांचेकडे असलेली महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची आयुर्विमा महामंडळाचे कर्ज, इतर कर्ज, पाणीपट्टी व विलंब आकार इत्यादि थकबाकीची रक्कम त्वरित महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे जमा करावी.

१४. नागरी दलित वस्ती योजनेंतर्गत आतापर्यंत मंजूर झालेल्या सर्व योजनांतील कामांच्या अंमलबजावणीचे संनियंत्रण करण्याची व योजनेवर प्रत्यक्ष होणारा खर्च याबाबतचा आढावा घेण्याची व्यवस्था संबंधित जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांनी निर्माण करुन त्या बाबतचा अहवाल दर महिन्याला सचिव, समाज कल्याण विभाग यांना सादर करावा.

१५. महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करून घेण्यासाठी संदर्भीय दिनांक २५ जुन, २०१० च्या शासन निर्णयातील परिच्छेद - १५ अनुसार राष्ट्रीयकृत बॅकेत स्वतंत्र खाते उघडणे आणि त्या खात्यात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सहभागाची रक्कम जमा करणे बंधनकारक राहील. संबंधित खाते क्रमांक या नगर परिषदेने महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कार्यालयास परस्पर कळवावा.

१६. सदर योजनेअंतर्गत नगर परिषदेस अनुज्ञेय होणाऱ्या अनुदानावरील खर्च हा
मागणी वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता,
०१, पाणी पुरवठा, १९२, महानगरपालिका/नगर परिषदांना सहाय्य,
(०२) राज्य योजना (१२) महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था)
नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द कुटुंबियांना खाजगी नळ जोडणी व वैयक्तिक शौचालये यासाठी सहाय्यक अनुदान ( २२१५ ९३१६ ),
३१ सहाय्यक अनुदान

या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. **त्या अनुषंगाने, सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध करून दिलेल्या निधीमधून परिच्छेद - ३ मध्ये नमूद केलेली अनुदानाची पहिल्या हप्त्याची रक्कम शेगांव नगर परिषदेस वितरित करावी. तसेच या अनुरुप अनुदान वितरणाचे लेखे ठेवावेत. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत या योजनेअंतर्गत प्रत्यक्ष अनुदान वितरणाचे आदेश वेळोवेळी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास देण्यात येतील. त्या शासन आदेशांच्या अनुषंगाने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने अनुदान वितरीत करावे.**

१७. नगर परिषदेने सदर योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेच्या प्रगतीचा अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे नगर परिषदेने नियमितपणे शासनास सादर करावीत. राज्य शासनाकडून देण्यात येणाऱ्या पहिल्या हप्त्याच्या अनुदानापैकी ७०% अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधित नागरी स्थानिक संस्थेकडून शासनाकडे सादर करण्यात आल्यानंतर आणि नगर परिषदेने स्वत:च्या हिश्श्याच्या पूर्ण रक्कमेचा राष्ट्रीयकृत बँकेतील स्वतंत्र खात्यात भरणा केल्यानंतरच राज्य शासनाचे उर्वरित अनुज्ञेय अनुदान वितरित करण्यात येईल.

१८. महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत राज्याच्या नागरी भागातील सर्व अनुसूचित जाती व नवबौध्द कुटुंबियांकडे खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालये उपलब्ध होण्यासाठी हा कार्यक्रम यशस्वीरित्या राबविणे अत्यंत आवश्यक आहे. त्यामुळे नगर परिषदेने या कार्यक्रमाची अंमलबजावणी विहीत कालमर्यादेत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

१९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०२१५४५१२४५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PARDESHI ANAND G

Digitally signed by PARDESHI ANAND G
DN: CN = PARDESHI ANAND G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.09.03 17:55:47 +05'30'

( आ.ग.परदेशी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, परिमन पॉईंट, मुंबई
७. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
८. संचालक, समाज कल्याण संचालनालय, मुंबई
९. महालेखापाल-१ मुंबई
१०. महालेखापाल-२ नागपूर
११. आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई
१२. संचालक, लेखाकोषागार, मुंबई.
१३. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे
१४. अध्यक्ष / मुख्याधिकारी, शेगांव, जि.बुलढाणा
१५. उपआयुक्त, नगरपालिका प्रशासन कक्ष, विभागीय आयुक्त,महसुल विभाग अमरावती

१६. विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी, बुलढाणा
१७. जिल्हा कोषागार अधिकारी,बुलढाणा
१८. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्याल, बुलढाणा
१९. जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगरपरिषद प्रशासन , जिल्हाधिकारी कार्यालय,बुलढाणा
२०. निवडनस्ती पापु-२२